आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजना - अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(लेखाशिर्ष २८१० ०९७४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.०९/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ०९ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ व क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र. ३७५/ऊर्जा-७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ऊर्जा विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या मुख्यमंत्री सौर कृषी पंप या योजनेंतर्गत सौर कृषि पंपांसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून रु.१२.५४ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत वित्त विभागास संदर्भाधीन क्र.२ अन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा मधील मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजनेसाठी सन २०२४-२५ च्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.कोटीत)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| मुख्यमंत्री सौर कृषी पंप | २८१० ०९७४ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३८.०० | १२.५४ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१२.५४ कोटी (अक्षरी रुपये बारा कोटी चोपन्न लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, ऊर्जा विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय संदर्भाधीन क्र.१ मधील वित्त विभागाच्या मधील शासन परिपत्रकांन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ई-ऑफिस क्र.६७७/२०२४, दि.२३.०७.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१०२६५३०९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.08.09 15:30:45 +05'30'

**(राजेंद्र दे. भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.